| Shifting of 3 Sub-divisions from Thane Minor Irrigation Division, under Konkan Irrigation Development Corporation to Minor Irrigation Division, Nashik under Godavari Marathwada Irrigation Development Corporation and controlling powers under the Konkan Irrigation Development Corporation. |
| --- |

**कोकण प्रदेशांतर्गत, ठाणे लघु पाटबंधारे विभागांतर्गत असलेले ३ उपविभाग, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत उत्तर महाराष्ट्र प्रदेशांतर्गत लघु पाटबंधारे विभाग, नाशिकला जोडणे व त्यांचे नियंत्रण कोकण पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडे ठेवणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक:- आढावा-२०११/प्र.क्र.२३६/२०११/आ (प्रशि)**
**जलसंपदा विभाग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- १२/१०/२०११.**

वाचा:- शासन निर्णय क्र.आढावा-२०१०/प्र.क्र.७९/१०/आ (प्रशि), दि.१९ जानेवारी, २०११.

**<u>प्रस्तावना:-</u>**

नाशिक जिल्ह्यातील पश्चिम वाहिनी नद्यांच्या क्षेत्रात चार तालुके मोडतात. मोठया प्रमाणावर पडणाऱ्या पावसाचे पाणी पश्चिम वाहिनी नद्यांद्वारे समुद्रात वाहून जात असल्याने या तालुक्यात सिंचन प्रकल्प व्हावेत तसेच या भागातील कामांचे नियंत्रण ठाणे स्थित लघु पाटबंधारे विभागाकडे असल्याने स्थानिक कामांचा पाठपुरावा व्हावा याचा विचार करुन कोकण पाटबंधारे विकास महामंडळाकडील दोन उप विभाग फिरवाफिरवीने लघु पाटबंधारे उप विभाग सुरगाणा व लघु पाटबंधारे उप विभाग त्र्यंबक या नावाने कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, ठाणे यांचे अंतर्गत शासन निर्णय, दिनांक १९ जानेवारी, २०११ अन्वये वर्ग करण्यात आले आहेत.

तथापि सुरगाणापासून ठाणे सुमारे २२० कि.मी.अंतरावर असल्याने नाशिक विभागातील स्थानिक जनतेला व विशेषत: आदिवासींना दूर जावे लागते.

वरील सर्व परिस्थितीचा विचार करता स्थानिक लोकांच्या सोईच्या दृष्टीकोनातून तसेच एकंदरीत कामकाजात सुसुत्रता येण्याकरिता एका विभागातील काही उप विभागांचे पर्यवेक्षण स्वतंत्ररित्या दोन्ही महामंडळांकडे ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय:-</u>**

कोकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे यांच्या अधिपत्याखालील लघु पाटबंधारे विभाग, ठाणे अंतर्गतच्या (१) लघु पाटबंधारे उप विभाग त्र्यंबकेश्वर, (२) लघु पाटबंधारे उप विभाग, पेठ व (३) लघु पाटबंधारे उप विभाग सुरगाणा हे ३ उपविभाग गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक/अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांचे अंतर्गत असलेल्या कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नाशिक यांच्या नियंत्रणाखाली वर्ग करण्यात येत आहेत. तथापि सदर उपविभागांचे नियंत्रण मात्र कोकण पाटबंधारे विकास महामंडळाकडे राहील. लघु पाटबंधारे विभाग, नाशिक अंतर्गत असलेले उर्वरित १) लघु पाटबंधारे उप विभाग नाशिक, २) लघु पाटबंधारे उप विभाग घोटी, ३) लघु पाटबंधारे उप विभाग पांडाने व

४) पूल उप विभाग, नाशिक या ४ उप विभागांचे नियंत्रण गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडे पूर्वीप्रमाणे राहील.

२. हा शासन निर्णय क्र.वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२ मधील तरतूदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१११०१२१६०२२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( उमा म. सावंत )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (कृ.खो.) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या बदलाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ
निवडनस्ती धारिका